अर्थसंकल्पीय अनुदान सन २०२१-२२ आर.आर.(आबा) पाटील सुंदर गांव पुरस्कार योजनेतर्गत सन २०१९-२० मध्ये निवड झालेल्या “तालुका सुंदर गांव” ग्राम पंचायतींना निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक:- सुंगायो-२०२१/प्र.क्र.७४/योजना-११
बांधकाम भवन, २५, मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक:- ०९ नोव्हेंबर, २०२१.

वाचा :-

**१) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१-अ/योजना-१, दि.२१.११.२०१६**

**(२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१.**

**(३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.**

प्रस्तावना :-

शासन निर्णय क्र.स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१/अ/योजना-१, दि.२१ नोव्हेंबर, २०१६ अन्वये, आर.आर.(आबा) पाटील सुंदर गांव पुरस्कार योजनेसाठी सन २०१९-२० मध्ये प्रथम स्तरावरील तालुका सुंदर गांव ग्रामपंचायतींना रोख स्वरुपात पारितोषिक वितरण करण्यात येईल अशी तरतूद आहे. त्यानुषंगाने, राज्यातील तालुका सुंदर गांव ग्रामपंचायतींना पुरस्कार देण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

आर.आर.(आबा) पाटील सुंदर गांव पुरस्कार योजनेअंतर्गत राज्यातील ३५१ तालुका सुंदर गांव व ३४ जिल्हा सुंदर गांव म्हणून निवड झालेल्या ग्रामपंचायतीना अनुक्रमे रु.१०.०० लक्ष व रु.४०.०० लक्ष अशी पारितोषिकांची रक्कम अदा करण्यात येते. या योजनेकरिता सन २०२१-२२ मध्ये मागणी क्रमांक-एल-३, २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य, (००) (०१) स्मार्ट ग्राम योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी पंचायत राज संस्थांना सहायक अनुदान (कार्यक्रम) -३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२५१५ १६७७) या लेखाशिर्षाखाली रु.५५,००,००,०००/-(रुपये पंच्चावन

कोटी फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली असली तरी वित्त विभागाच्या दि.२४.०६.२०२१ च्या शासन निर्णयास अनुसरुन वित्त विभागाने अर्थसंकल्पित तरतुदीच्या ५०% इतका निधी ( रुपये २७.५० कोटी) (रु.सत्तावीस कोटी पन्नास लक्ष फक्त) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) उपलब्ध करुन दिला आहे.

२. शासन निर्णय क्र.स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१ अ/ योजना १, दि.२१.११.२०१६ मधील परिशिष्ट ब नुसार स्मार्ट ग्राम योजनेसाठी प्रथम स्तरावरील तालुका स्मार्ट ग्रामपंचायतींना रोख स्वरुपात पारितोषिक वितरण करणे आवश्यक आहे. त्यानुसार सन २०१९-२० करिता रु. २७,५०,००,०००/- (रु.सत्तावीस कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी वितरणासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) उपलब्ध करुन देण्यात आलेला असल्याने खाली नमूद जिल्ह्यातील २७५ ग्रामपंचायतींना प्रत्येकी रु.१० लक्ष याप्रमाणे निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | तालुका स्मार्ट निवडलेल्या ग्रामपंचायतीची संख्या | प्रति ग्राम पंचायत रु.१०.०० लक्ष या प्रमाणे वितरीत करावयाचा निधी(लाखात.रु) |
|---|---|---|---|
| १. | रत्नागिरी | ९ | ९०.०० |
| २. | सिंधुदुर्ग | ८ | ८०.०० |
| ३. | पुणे | १३ | १३०.०० |
| ४. | सातारा | ११ | ११०.०० |
| ५. | सांगली | १० | १००.०० |
| ६. | सोलापूर | ११ | ११०.०० |
| ७. | कोल्हापूर | १२ | १२०.०० |
| ८. | नाशिक | १५ | १५०.०० |
| ९. | धुळे | ४ | ४०.०० |
| १०. | नंदुरबार | ६ | ६०.०० |
| ११. | अहमदनगर | १४ | १४०.०० |
| १२. | औरंगाबाद | ९ | ९०.०० |
| १३. | परभणी | ९ | ९०.०० |
| १४. | नांदेड | १६ | १६०.०० |
| १५. | जालना | ८ | ८०.०० |
| १६. | उस्मानाबाद | ९ | ९०.०० |

| अ.क्र. | जिल्हा | तालुका स्मार्ट निवडलेल्या ग्रामपंचायतीची संख्या | प्रति ग्राम पंचायत रु.१०.०० लक्ष या प्रमाणे वितरीत करावयाचा निधी(लाखात.रु) |
|---|---|---|---|
| १७. | हिंगोली | ५ | ५०.०० |
| १८. | अमरावती | १४ | १४०.०० |
| १९. | अकोला | ७ | ७०.०० |
| २०. | यवतमाळ | १६ | १६०.०० |
| २१. | वाशिम | ६ | ६०.०० |
| २२. | बुलडाणा | १३ | १३०.०० |
| २३. | वर्धा | ८ | ८०.०० |
| २४. | चंद्रपुर | १५ | १५०.०० |
| २५. | गडचिरोली | १२ | १२०.०० |
| २६. | भंडारा | ७ | ७०.०० |
| २७. | गोंदिया | ८ | ८०.०० |
| | | **२७५** | **२७५०.००** |

३. उपरोक्त निधी वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हा परिषदांच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी वितरीत करावयाच्या रकमा कोषागारातून काढुन संबंधितांना प्रदान करण्याची व्यवस्था करावी. याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे नियंत्रक अधिकारी राहतील. निधी वितरीत केल्यानंतर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी तालुका स्मार्ट ग्रामपंचायतींना पारितोषिकांचा निधी संबंधित ग्रामपंचायतीमार्फत नाविण्यपूर्ण विकास कामासाठी खर्च केला आहे याबाबतची माहिती तातडीने सादर करावी.

४. शासन निर्णय क्रमांक-स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१-अ/योजना-११, दि.१६.४.२०१८ मधील तरतुदीन्वये, नाविण्यपूर्ण कामाऐवजी अन्य विकास कामे ज्या तालुका स्मार्ट ग्रामपंचायतींना पूर्ण करावयाची आहेत अशा विकास कामाकरिता शासनाची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

५. नियंत्रण अधिकाऱ्यांनी या योजनेकरिता झालेल्या /होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घेऊन प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयास झालेला खर्च यामध्ये तफावर राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर अनुदानाचे

उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) महालेखापाल कार्यालयास सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी.

६. सदरील खर्च सन २०२१-२२ करिता लेखाशिर्ष मागणी क्रमांक-एल-३, २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य, (००) (०१) स्मार्ट ग्राम योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी पंचायत राज संस्थाना सहायक अनुदान (कार्यक्रम) -३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२५१५ १६७७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/ प्र.क्र.४४ /अर्थ-३, दि.१.४.२०१९, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.४.५.२०२० व क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८ /अर्थ ३, दि.०६.०४.२०२१ अन्वये दिलेल्या सूचनानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०९१४४६१३६२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUBHASH UTTAM RATHOD

Digitally signed by SUBHASH UTTAM RATHOD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4900ceadef378ce6953fc366d818c664ad0c54be36d6234bdc213e86d85816c2, pseudonym=BCD86FFD867AD43A7B590E9CD3A8BDBDCA27C96B, serialNumber=1C01985DAA2DB39DF76EF8C33C169711D61EA01A32C5E5CACFAE4CC6C6F928A2, cn=SUBHASH UTTAM RATHOD
Date: 2021.11.15 16:10:52 +05'30'

**(सुभाष राठोड)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्ष नेता (विधान परिषद/विधानसभा), यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व मा.विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. निवासी लेखा अधिकारी
१०. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (सर्व)
११. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
१२. सर्व विभागीय आयुक्त.
१३. सर्व जिल्हाधिकारी,.
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७. सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत).
१८. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१५),मंत्रालय, मुंबई-३२.
१९. कक्ष अधिकारी (वित्त -१) ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
२०. निवड नस्ती (योजना-११).